आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांच्या आस्थापनेवरील सह आयुक्त, समाज कल्याण, गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सन २०२१ मधील बदल्यांबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः सकआ - २०२१/अ.नौ.सं.क्र.१/ आस्था-२**
मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक
मादाम कामा मार्ग, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २३ सप्टेंबर, २०२१.

**शासन आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या नियम - ४ मधील तरतुदीनुसार समाज कल्याण आयुक्तालयाच्या आस्थापनेवर कार्यरत असलेल्या सह आयुक्त, समाज कल्याण व तत्सम, गट-अ (सातव्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी S-२५ : ७८८००-२०९२००) संवर्गातील खालील अधिकाऱ्याची सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने बदली करण्यात येत असुन, त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी त्यांची बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नांव | सध्या कार्यरत ठिकाण | प्रतिनियुक्तीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.डी.डी.देशमुख | सह आयुक्त तथा सदस्य सचिव, राज्य मागासवर्ग आयोग, पुणे | वरिष्ठ प्रकल्प संचालक (समाज कल्याण), छत्रपती शाहु महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था, (सारथी) पुणे या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे. |

२. बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरिता पुढील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे -

१) बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर आयुक्त समाज कल्याण, पुणे यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्यास बदली झालेल्या पदावर रुजु होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे.

२) बदली झालेला अधिकारी संबंधित कार्यालयातून कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यावर त्यांना विनाविलंब रुजू करुन घ्यावे. एखाद्या अधिकाऱ्यास रुजू करुन न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतीक्षा काळ ठरवून काम न देता वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्‌भवल्यास संबंधित आस्थापना अधिकाऱ्यांस जबाबदार धरण्यात येईल.

३) बदली आदेशात बदल करुन घेण्यासाठी संबंधित अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे अधिकारी शिस्तभंग विषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९२३१६०६१०४९२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vishnudas Pundlikrao Ghodke
Date: 2021.09.23 16:07:18 +05'30'

**( वि.पुं.घोडके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित अधिकारी (आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांच्यामार्फत)

**प्रत,**

१) आयुक्त, समाज कल्याण, पुणे
२) आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे
३) संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे
४) महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई
६) सह आयुक्त तथा सदस्य सचिव, राज्य मागासवर्ग आयोग, पुणे
७) मा.उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८) मा.मंत्री (सा.न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
९) मा.मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१०) मा.राज्यमंत्री (सा.न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
११) मा.राज्यमंत्री (इतर मागास बहुजन कल्याण विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१२) अपर मुख्य सचिव (सा. न्या. व वि. स. विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१३) अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१४) प्रधान सचिव (इतर मागास बहुजन कल्याण विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१६) निवडनस्ती आस्था-२.